**महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-अ (प्रशासन शाखा) संवर्गातील शिक्षण सहसंचालक या पदांची दिनांक ३१.१२.२०२० अखेरची म्हणजेच दिनांक ०१.०१.२०२१ रोजीची अंतीम ज्येष्ठतासूची.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः ज्येष्ठता-२१२१/प्र.क्र.८/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ३२
तारीख: १९ एप्रिल, २०२२

वाचा : १. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन परिपत्रक क्र. ज्येष्ठता-२१२१/प्र.क्र.८/ प्रशा-२, दिनांक ०५.१०.२०२१.

२.आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालयाचे पत्र क्र. आस्था-ब/१२४/ज्येसू/शिससं /२०२२/१७५४, दिनांक २५.०३.२०२२

**शासन परिपत्रक**

महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-अ (प्रशासन शाखा) संवर्गातील शिक्षण सहसंचालक पदाची दिनांक ०१.०१.२०२१ रोजची तात्पुरती ज्येष्ठता सूची संदर्भाधीन दिनांक ०५.१०.२०२१ रोजीच्या परिपत्रकान्वये प्रसिध्द करण्यात आली आहे. सदर ज्येष्ठता सूचीसंबंधी काही आक्षेप असल्यास, विहित कालावधीत ते आयुक्त (शिक्षण) यांचेमार्फत शासनास पाठविण्याच्या सूचना देण्यात आल्या होत्या.

२. सदर ज्येष्ठतासूचीवर कोणत्याही अधिकाऱ्यांने आक्षेप नोंदविलेले नाहीत.

३. ज्येष्ठतासूची महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियम १९८२ च्या नियम ४ व ५ मधील तरतूदीनुसार जे पदोन्नत अधिकारी नियमानुसार पदोन्नत पदावर विहित मुदतीत रूजू झालेल्या अधिकाऱ्यांची आपापसातील ज्येष्ठता राखण्यात आली आहे.

४. सदर ज्येष्ठतासूची सामान्य प्रशासन विभागाच्या अधिसूचना क्रमांक एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.२८१/बारा, दिनांक २१.०६.२०२१ नुसार तयार करण्यात आली आहे.

५. मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दिनांक ०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये, दिनांक २५.०५.२००४ चा शासन निर्णय रद्द करुन पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. सदर निर्णयास आव्हानित करण्यासाठी मा. सर्वोच्च न्यायालयात

दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल करण्यात आली आहे. सदर विशेष अनुज्ञा याचिकेमधील अंतिम निर्णयाच्या अधिन राहून ही ज्येष्ठतासूची निर्गमित करण्यात येत आहे. त्यानुसार सन २००४ नंतरच्या निवडयाद्यांमध्ये बदल झाल्यास त्यानुसार सदर ज्येष्ठतासूचीमध्ये बदल होईल, या अटीच्या अधीन राहून ही ज्येष्ठतासूची प्रसिध्द करण्यात येत आहे.

६. उक्त वस्तुस्थिती विचारात घेऊन महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-अ (प्रशासन शाखा) संवर्गातील शिक्षण सहसंचालक पदाची दिनांक ०१.०१.२०२१ रोजीची अंतीम ज्येष्ठतासूची सोबतच्या प्रपत्रामध्ये प्रसिध्द करण्यात येत आहे.

७. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४१९१२५५५४७४२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DEEPAK VIJAY SHELAR

Digitally signed by DEEPAK VIJAY SHELAR
DN: CN = DEEPAK VIJAY SHELAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = SCHOOL EDUCATION DEPARTMENT
Date: 2022.04.19 12:58:16 +05'30'

**( दीपक शेलार )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त शिक्षण, आयुक्त शिक्षण यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य पुणे,
२. सर्व संबंधित अधिकारी आयुक्तालयामार्फत
३. निवड नस्ती.

| शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन परिपत्रक क्र. ज्येष्ठता-२१२१/प्र.क्र. ०८ /प्रशा-२, दि १९.०४.२०२२ सोबतचे सहपत्र प्रपत्र-अ | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| शिक्षण सहसंचालक व समकक्ष पदावरील अधिकाऱ्यांची दिनांक ३१.१२.२०२० अखेरची म्हणजेच दिनांक ०१.०१.२०२१ रोजीची अंतीम ज्येष्ठता सूची | | | | | | | | | |
| ज्येष्ठता क्रमांक | अधिकाऱ्यांचे नांव | नियुक्तीचा मार्ग (सरळसेवेने/ पदोन्नतीने | जन्म दिनांक | प्रवर्ग (नियुक्तीनंतर प्रवर्ग बदलला असल्यास त्याचा दिनांक | नियुक्तीचा दिनांक | ज्येष्ठता दिनांक/ ज्येष्ठतेचा मानीव दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | शैक्षणिक अर्हता | अभिप्राय |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १ | श्री. तु.ना. सुपे | पदोन्नती | ०१.०६.१९६४ | अ.ज. | १७.०७.२०१७ | १७.०७.२०१७ | ३१.०५.२०२२ | एम. ए. बी. एड. | |
| २ | श्री.दिनकर ता टेमकर | पदोन्नती | ०१.०६.१९६४ | खुला | १२.०६.२०१८ | १२.०६.२०१८ | ३१.०५.२०२२ | एम. एस. सी. बी. एड. | |
| ३ | श्री. शरद शं. गोसावी | पदोन्नती | ०२.१२.१९७२ | भ.ज.(ब) | ११.०६.२०१८ | ११.०६.२०१८ | ३१.१२.२०३० | एम. एस. सी. बी. एड. | |
| ४ | श्री. महेश म. पालकर | पदोन्नती | १५.०७.१९७० | इ.माव | २३.०८.२०१८ | २३.०८.२०१८ | ३१.०७.२०२८ | एम. ए. एम. एड. | |
| ५ | श्री. कृष्णकुमार भा. पाटील | पदोन्नती | २३.०८.१९७० | खुला | १८.०६.२०१८ | १८.०६.२०१८ | ३१.०८.२०२८ | एम. एस. सी. बी. एड. | |